“सत्यशोधक” हा मराठी चित्रपट राज्यातील शाळांमधील विद्यार्थ्यांना दाखविण्यास परवानगी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२४/प्र.क्र.२०/प्रशिक्षण**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: ७ मार्च, २०२४

वाचा

१. श्री.प्रवीण तायडे, निर्माता, समता फिल्मस्, अकोला, यांचे दि. १०.०१.२०२४ रोजीचे निवेदन
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग पत्र क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.२५/प्रशिक्षण, दि.०५.०३.२०२०
३. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र. पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.राशैसंवप्रपम/प्रमा/ सत्यशोधक अहवाल/२०२३-२४/००८६७ दि.१६.०१.२०२४

**शासन निर्णय:-**

श्री.प्रवीण तायडे, निर्माता, समता फिल्मस्, अकोला यांनी "सत्यशोधक" हा मराठी चित्रपट राज्यातील शाळांमधून विद्यार्थ्यांना दाखविण्यास परवानगी देण्याबाबत संदर्भाधीन दिनांक १०/०१/२०२४ च्या पत्रान्वये विनंती केलेली आहे. त्यानुसार सदंर्भ क्र .३ येथील पत्रान्वये नमूद कार्यवाहीकरिता गठीत परिक्षण समितीचा अहवाल प्राप्त झाला आहे.

“सत्यशोधक” या चित्रपटात महात्मा ज्योतिराव फुलेंचा समाज परिवर्तनासाठी केलेला संघर्ष दाखवलेला असून, आधुनिक महाराष्ट्राच्या विकासात दिलेले योगदान, कामगार चळवळ, महिलांचा शैक्षणिक विकास व आधुनिक इमारतींची बांधणी, या सर्वच क्षेत्रात फुलेंनी केलेली भरीव कामगिरी तसेच त्या संघर्षात माता सावित्रीबाई फुलेंनी त्यांना अतिशय प्रतिकूल परीस्थित दिलेली साथ नमूद करुन या दाम्पत्याने आयुष्याच्या शेवटपर्यंत केलेले समाज प्रबोधन दाखविण्यात आले आहे. त्यामुळे या चित्रपटातून विद्यार्थी महात्मा फुलेंचा आणि महाराष्ट्राचा इतिहास बघू शकणार आहेत. यास्तव “सत्यशोधक” हा चित्रपट राज्यातील शाळांमधील विद्यार्थी/विद्यार्थीनींना दाखविण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शैक्षणिक वर्ष सन २०२३-२४, २०२४-२५ या वर्षापुरती परवानगी देण्यात येत आहे.

**अटी:-**

१) “सत्यशोधक” हा चित्रपट राज्यातील शाळांमधील इयत्ता १ ते १२ वी मधील सर्व वयोगटातील विद्यार्थ्यांना दाखविण्यास परवानगी देण्यात येत आहे .

२) सदर चित्रपट पाहण्याची कोणत्याही विद्यार्थ्यांना सक्ती करण्यात येणार नाही.

३) विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक अभ्यासक्रमात कोणताही अडथळा येणार नाही, याची योग्य ती दक्षता घेण्यात यावी.

४) या शासन परवानगीच्या आधारे सदर चित्रपट दाखविण्याबाबत इतर दुसऱ्या कोणत्याही संस्थेबरोबर श्री.प्रवीण तायडे, निर्माता, समता फिल्मस्, अकोला यांना करार करता येणार नाही किंवा प्रतिनिधी नेमता येणार नाही व तशी परवानगी त्यांना राहणार नाही.

५) सदरहू चित्रपट पहाण्यास इच्छुक विद्यार्थ्यांकडून रुपये २०/- (रुपये वीस फक्त) पेक्षा जास्त शुल्क आकारता येणार नाही.

६) हा चित्रपट शाळांमधून दाखविताना कोणत्याही प्रकारचा वाद उद्धभवल्यास किंवा तक्रारी प्राप्त झाल्यास सदर संस्थेस दिलेली परवानगी तात्काळ रद्द करण्यात येईल.

७) सदर चित्रपट दाखविण्याची परवानगी शैक्षणिक वर्ष २०२३-२४, २०२४-२५ वर्ष पुरतीच मर्यादित राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७१२१९१८११२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHEETAL BAJIRAO PATIL

Digitally signed by SHEETAL BAJIRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=6adeda15802b25aea33a6c776475fa0e7bf7705ff3cfb01e460cd55351e58270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BDBFE7A78900AD71C27AF6074AFF455E2E529BC5573C2D2CC1BBFC69F0E7579, cn=SHEETAL BAJIRAO PATIL
Date: 2024.03.07 12:28:37 +05'30'

**( शितल पाटील )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. मा.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. शिक्षण संचालक, (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, पुणे.
६. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. विभागीय शिक्षण उप संचालक (मुंबई/पुणे/कोल्हापूर/नाशिक/ औरंगाबाद/ लातूर/अमरावती/ नागपूर.
८. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) जिल्हा परिषद, महाराष्ट्र राज्य.
९. शिक्षण निरीक्षक, (उत्तर / पश्चिम /दक्षिण विभाग) मुंबई.
१०.श्री.प्रवीण तायडे, निर्माता, समता फिल्मस्, अ-४, मॉ वैष्णवी रेसिन्डेसी ६, जवाहर नगर चौक, ता. जि. अकोला-४४४००१.
११.निवड नस्ती (प्रशिक्षण)